द्वापार युगाचा शेवट आणि कलीयुगाचा प्रारंभ होण्याच्या संगम काळी द्वारका नगरीत राजसभा आयोजित करण्यात आली होती. या राजसभेचे आयोजनच मुळी द्वारकाधीश भगवान श्री कृष्णांनी केले होते, त्यांनी खास दुतांकरवी संदेश पाठवून नऊ नारायणांना आमंत्रित केले होते. हे नऊ नारायण म्हणजे नारायणाचा अंश असणारे आणि नारायणाचे कार्य करणारे म्हणून त्यांनाही 'नारायण' असे संबोधून त्यांना ओळखण्यात येत असे. तर या राजसभेत कलीयुगाच्या प्रारंभ होणार असल्याने श्रीकृष्णासह सर्वांनी कलीयुगात अवतार घावायाचा आहे असा मानस साक्षात श्रीकृष्णांनीच व्यक्त केला होता आणि त्यासाठी उपस्थितांनी सहमती प्रकट केली होती. त्या अनुषंगाने कविनारायण, हरिनारायण, करभंजननारायण, आंतरीक्षनारायण, प्रबुद्धनारायण, द्रुमिलनारायण, चमसनारायण, अविर्होत्रनारायण आणि पिप्पलायननारायण, यांनी अनुक्रमे मच्छिंद्रनाथ, गोरक्षनाथ, गहिनीनाथ, जालिंदरनाथ, कानिफनाथ, भर्तरीनाथ, रेवणनाथ, वटसिद्धनाथ आणि चर्पटीनाथ यांच्या नामाभिधानाने अवतार कार्यास प्रारंभ करून लक्षणीय कालावधी होऊन गेला. या दरम्यान प्रत्येक नाथांनी अचाट आणि अफाट पराक्रमांनी आपले अस्तित्व सिद्धही केले. सर्वात शेवटी नवव्या नाथांची म्हणजे पिप्पलायन नारायण अवतरीत चर्पटीनाथांची चित्तथरारक समरकथा ही तर शौर्याची आणि धाडसाची परिसीमाच म्हणवी लागेल. लौकिक अर्थाने चर्पटीनाथ हा ब्रम्हदेवाच्या अंशातून निर्माण झाला म्हणजे ब्रम्हदेवाचा मुलगाच, भगीरथी नदीच्या काठावरील कुशबेटावरील गवताच्या कुरणावर यांची उत्पत्ती झाली आणि सत्यश्रवा चंद्रा या ग्रामजोशी दांपत्यांनी त्याचे पालनपोषण केले. पण नारदांनी अत्यंत चातुर्याने चर्पटीनाथांना येनकेन प्रकारे किशोरावस्थेत सत्यश्रवाच्या घरातून बाहेर काढले आणि श्रीदत्ताच्या सेवेसाठी सुपूर्द केले. श्रीदत्तांनी त्याला शस्त्रअस्त्र कला निपुण केले आणि त्याच्या अध्यात्मिक उन्नतीसाठी त्याला तीर्थाटनास जाण्याचा आदेश दिला. आदेश प्रमाण मानून चर्पटीनाथांनी संपूर्ण हिंदुस्थानी उपखंडाला प्रदक्षिणा घालून तीर्थयात्रा पूर्ण केली आणि स्वर्गातील मणीकर्णिकेत तसेच पाताळातील भोगावतीमध्ये स्नान करायची मनोकामना पूर्ण करण्यासाठी ते प्रथम स्वर्गामध्ये गेले. नारदांनी ब्रम्हदेव आणि चर्पटी या पितापुत्रांची भेट घडवून दिली. कधी काळी देवंद्राने नारदाची टवाळी केल्याचा सूड उगविण्यासाठी चर्पटीच्या सामार्थायचा नारदांनी उपयोग करून घेतला. त्याची परिणीती अशी झाली की स्वर्गात रणकंदन झाले आणि त्या संघर्षात साक्षात इंद्र, श्रीशिव आणि श्रीविष्णू यांच्याच आहुती पडल्या. ब्रम्हदेवांनी दुःख व्यक्त करून ही महाभयंकर चूक चर्पटीच्या लक्षात आणून दिली. चर्पटीने दिलगिरी व्यक्त करून संजीवनी मंत्रा द्वारे सकल शिवगण, देवगण, आणि विष्णूगणांसह श्रीशिव, श्रीविष्णू आणि देवेंद्र यांना पुनश्च सजीव केले.

हा नवव्या नाथांचा कथाक्रम आपण वाचला. आता नऊ नाथांविषयीचा कथाक्रम ग्रंथकर्त्याने संपुष्टात आणला असून नऊ नारायणांच्या मृत्युलोकातील अवतार कार्याच्या कारकिर्दीचा तपशील पूर्णत्वास गेला असून प्रारंभी उल्लेख केलेल्या राजसभे सारखीच इंद्रलोक अमरपुरीत देवराज इंद्राच्या दरबारात सभा अर्थात देवसभा भरली आहे. ती कथा ही उपसंहार आणि समारोप करणारी पण भाविकांना दिलासा देणारी अशीच आहे. तर इंद्राच्या दरबारात देवसभा भरली आहे. सर्व देव आसनस्थ झाले आहेत. सवर्णसिंहासनावर आसनस्थ इंद्र देवमंडळात शोभून दिसत आहेत. दरबारातील वातावरण धीरगंभीर आहे. चर्पटीनाथाने श्रीशिव, श्रीविष्णू आणि देवेंद्र यांच्यासह सर्व देवतांचा पराभाव करून वैभवशाली देवलोक कस्पटासमान, एखादा क्षुद्र माशीसारखा रगडून टाकला होता. या पराभावाचे शल्य देवेंद्राच्या वर्मी सलत होते. या तणावपूर्ण गंभीर वातावरणाचा छेद करीत इंद्र म्हणाला, "देवगुरु बृहस्पतीजी, चर्पटी नावाच्या एका नाथपंथी बालकाने

हरी हर यांच्यासह देवलोकाची दुर्दशा करून सूर्य तेजासम महान पराक्रम केला आहे. नाथपंथीयांकडे वाताकर्षण विद्या असल्याने त्यांच्यापुढे देवदानव दुबळे ठरले आहेत. अनेक वेळा त्यांनी आपला सपशेल पराभव करून अपमानित केले आहे. त्यांना कशाप्रकारे लगाम घालून थांबवावे ते सुचत नाही. या समस्येवर कायमस्वरूपी तोडगा काढणे आवश्यक आहे. अन्यथा वारंवार अशा अपमानकारक प्रसंगाची पुनरावृत्ती होऊन आपण त्यांच्यापुढे गौण ठरणार आहोत आणि तसे झाले तर भूतलावर जाऊन त्यांची गुलामी करावी लागेल. ते जसे भटकतात तसे त्यांच्यामागे रानोमाळ भटकावे लागेल. देवलोकांना हे शोभादायक नाही. सबब, कोणती युक्ती करून ती विजयी विद्या प्राप्त करू शकू? मी तर दारूण निराश आणि भयभीत झालो असून मला येथे सावधान राहून सिंहासनाचे रक्षण करणे क्रमप्राप्त आहे. त्यामुळे आपणांकडे संकटमुक्त होण्याचा उपाय सुचविण्याची प्रार्थना आहे." यावर देवांचे गुरु बृहस्पती म्हणाले, "देवराज! नवनाथांना सन्मानपूर्वक येथेच आणावे. त्यांचे दास होऊन भूतलावर त्यांच्यामागे रानोमाळ भटकंतीचा प्रसंग येणार नाही. सोमयाग यज्ञ करायच्या निमित्त करून नवनाथांना स्वर्गात घेऊन यावे. त्यांची भक्ती करून त्यांना प्रसन्न करावे. प्रेमाने त्यांच्या हृदयी मोह, माया, ममता निर्माण करून आपला कार्यभाग साधावा."

देवगुरु बृहस्पतींच्या या उपदेशपर सल्ल्याचे स्वागत करून; 'नाथांना आण्यासाठी कोणाला पाठवावे?' असे त्यांना विचारण्यात आले. त्यावर ते म्हणाले, "राजन! अष्ट वसुतील उपरिचर वसु हे मच्छिंद्राचे पिता आहेत. देवांतर्फे निमंत्रण देण्यासाठी त्यांना नवनाथांकडे दूत म्हणून पाठवावे. ते मच्छिंद्रांना भेटून नवनाथांना स्वर्गात घेऊन येतील. मग तुम्ही मच्छिंद्रासह सर्वांना प्रेमाने, सेवेने, भक्तीने प्रसन्न करून घावे. मच्छिंद्र दयाळू आहेत. गोड वाणीने स्तुती केल्यास कार्यभाग साध्य होईल." गुरु आज्ञेप्रमाणे इंद्राने त्वरित मातलीकरवी संदेश पाठवून उपरिचरांना बोलावले. देवेंद्र म्हणाला, "महाराज! सोमयाग करण्याची मनोकामना झाली आहे. तरी आपण विमानयान भूतलावर नेऊन मच्छिंद्रासह नवनाथांना सन्मानपूर्वक अमरपुरीत आणावे. मग सोमयागाचे कार्य त्यांच्या हस्ते पार पाडू या. आपण हे कार्य यशस्वी करावे." उपरिचरांनी, "आपली आज्ञा प्रमाण आहे." असे म्हणत तत्काळ विमानात बसून बद्रीकाश्रमी मच्छिंद्राजवळ गेले. त्याठिकाणी योगायोगाने गोरक्षनाथ, धर्मनाथ, चौरंगीनाथ, कानिफनाथ, गोपीचंद, जालिंदरनाथ, अडबंगनाथ एकत्र जमले होते. अशा या नाथमंडळीत मच्छिंद्रनाथ बसले असतांना अचानक समोर उपरिचर पित्याला पाहताच नम्रपणे त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून नमन केले. आदराने त्यांच्याजवळ बसून क्षेमकुशल विचारले. तेव्हा वसु म्हणाले, "नाथांनो मी देवेंद्राचे निमंत्रण घेऊन आलो आहे. नवनाथांच्या हस्ते सोमयाग करण्याचा देवेंद्रांचा मनोदय आहे. तरी आपण देव धर्म कार्यास सहाय्य करावे, अशी विनंती आहे." असे बोलून सर्वांचे मन प्रसन्न केले. मच्छिंद्राला गळ घालून ठाम होकार मिळविला. मग सर्व उपस्थितांसह विमानात बसून निघाले. गौड बंगाल हेलापट्टण येथून गोपीचंदमाता मैनावती, वडवाल गावातून नागनाथ, गौतमी तीरावरून भर्तरी, ताम्रपणी काठावरून चर्पटी आणि विटे गावातून रेवणनाथ यांना विमानात घेतले. चौऱ्याऐंशी सिद्धांनासुद्धा बरोबर घेतले. सर्वांना घेऊन विमान अमरपुरीत उतरले. देवराज इंद्राने सर्वांचे भव्य स्वागत केले. चरणस्पर्श करून वंदन केले. हात जोडून स्तुतीस्तोत्रे गाऊ लागला. मोठ्या आदराने त्यांना राजमहालात नेले. आपल्या आसनावर बसवून षोडशोपचारे पूजन केले. योग्यांचे योगी. तपस्व्यांचे तपस्वी, तेजःपुंज नवनाथ एकत्र पाहून त्यांना हर्ष झाला. हात जोडून नम्रपणे हवन कृत्याची मनोकामना सांगून कोणत्या स्थानी यज्ञ करावा, ते विचारता झाला. त्यावर बृहस्पती आणि मच्छिंद्रनाथ यांनी एकमताने सुचविले की, सिंहलीद्वीपावर समृद्ध, निसर्गरम्य अरण्य आहे. तिथे मुबलक जलसाठा आहे. यज्ञ साहित्यांची कमतरता पडणार नाही. मग उपरिचरांनी गंधर्वासह त्या

जागेची पाहणी केली आणि सर्वसंमतीने यज्ञ आरंभ केला. देवराज इंद्र व त्याची पत्नी शची जोडीने यज्ञास बसले. बृहस्पती मंत्रोच्चार करू लागले. नऊ नाथ 'स्वाहा' म्हणत समिधा आहुती टाकू लागले.

सदर सिंहलद्वीप किलोत्तलेच्या राज्य सिमेअंतर्गत असल्याने मच्छिंद्रनाथांना मीननाथाची आठवण आली. त्यांनी उपरिचरांना विचारले, "तातश्री, सिंहलद्वीपावर मीननाथास कुठे ठेवले आहे? यावर वसु म्हणाले, "मच्छिंद्रा! अटव्यवन या नावाने प्रसिद्ध असलेल्या त्यांच्याच राज्यसिमेअंतर्गत ते राहतात. मीच त्वरेने त्यांस घेऊन येतो." मग उपरिचरांनी स्वतः जाऊन स्नुषा मच्छिंद्रपत्नी किलोत्तला आणि नातू मच्छिंद्रपुत्र मीननाथ यांना आणून भेट घडविली. पत्नी आणि पुत्राला भेटून मच्छिंद्रनाथ काही वेळ भूतकालीन रम्य आठवणीत हरवून गेले. पूत्रमोहाने मच्छिंद्रनाथांनी विचार केला की, मीननाथाला विद्याभ्यास शिकविण्यासाठी तसेच देवतांचा आशीर्वाद प्राप्त करण्यासाठी हीच वेळ योग्य आहे. म्हणून यज्ञ कामातून ते काही वेळ काढून मीननाथाला शिकवू लागले. हे लक्षात येताच बृहस्पतीने इंद्राला सांगितले, "तुमच्याऐवजी उपरिचराला जोडीने यज्ञाला बसवा. तुम्ही इतरत्र लक्ष द्यावे." चाणाक्ष इंद्राने त्यातील गभीतार्थ लक्षात घेऊन स्वहातचे यज्ञ कंकण वसुंच्या हाती बांधले. मग तो सर्वांशी सौजन्याने वागत स्वतः सर्व यज्ञ साहित्य पुरवू लागला, समिधा, जलपात्र घेऊन हजर, फराळ भोजन घेऊन हजर, प्रत्येक गोष्टीसाठी सेवेस हजर! एवढे पुरे झाले नाहीतर स्वहस्ते जतींचे पाय चेपीत होता. इंद्राच्या या अशा सेवावृत्तीमुळे जतींचे मन प्रसन्न झाले. इंद्राच्या आतिथ्यसेवेमुळे सर्वच उपस्थित नाथ प्रसन्नचित्त झाले.

मीननाथाचा विद्याभ्यास सुरु असतांना देवेंद्रांने मोराचे रूप घेतले आणि समोरच्या झाडावर जाऊन बसला. मच्छिंद्रांनी मीननाथाला शिकवलेली विद्या, मोराच्या स्वरूपातील इंद्राने चोरून ऐकली. त्याला परमावधीचा आनंद झाला. एक वर्षभराच्या कालावधीत यज्ञ आणि मीननाथाचे अध्ययन सुरु होते, तोपर्यंत शिकवणीच्या वेळी इंद्र मोराच्या स्वरूपात हजर राहून कपटाने विद्या शिकत होता. यज्ञ समाप्ती झाल्यानंतर इंद्राने सर्व नाथांची पूजा केली. सुंदर वस्त्र आभूषणे देऊन त्यांचा सन्मान केला. सर्वांना सिंहासनावर बसवून नम्रपणे हात जोडत, खाली मान घालून, लज्जित होऊन समोर उभा राहिला आणि याचना करीत म्हणाला, "नाथ; मला काही सांगावयाचे आहे ते ऐका! माझ्याकडून एक अपराध घडला आहे. मीननाथाचा विद्याभ्यास सुरु असतांना मी मोराच्या रुपात उपस्थित राहून कपटाने चोरून विद्या ग्रहण केली आहे. तरी मला क्षमा करून, वरदहस्त देऊन, उजळ माथ्याने मिरवू द्यावे." इंद्राचे वक्तव्य ऐकून सर्वांना त्याच्या तीरास्कारीची जाणीव झाली. क्षणभर सर्वच नाथ गंभीर झाले. त्यांच्या अंतरात क्रोधाग्नी धडाडून पेटला आणि मुखातून शापवाणी बाहेर पडली. "हे तस्करेंद्रा, चौर्यकर्माने, कपटनीतीच्या पापी मार्गाने तू मिळवलेली विद्या निष्फळ होईल. अशाप्रकारे आम्हाला ठकविण्यासाठीच तू हे सोमयाग नाट्य घडवून आणले होतेस, हे आता उघड झाले आहे. आता आणखी काही शापवाणी उच्चारण्यापूर्वीच आमच्या नजरे समोरून दूर हो..." नवनाथाचा हा क्रोधाव्तार पाहून पुढील अनर्थ टाळण्यासाठी बृहस्पती आणि उपरिचर वसु मध्यस्थी करू लागले. हात जोडून नाथांची स्तुती, प्रार्थना करून समजूत काढू लागले. क्रोध आवरण्यासाठी विनंती करू लागले. घडू नये ते घडले आहे आता काही तरी उःशाप देण्याची विनंती करू लागले. दोघांनी अनेक प्रकारे समजूत काढून हळू हळू नाथांचा कोप शांत केला. मग नाथांनी उःशाप दिला, "इंद्राने बारा वर्षे कठोर तपःश्चर्या केल्यानंतरच विद्या फळेल. तथापि त्या विद्येचा वापर नाथपंथीयांवर होणार नाही..." असे म्हणून सर्व जती क्षणाचाही विलंब न करता उठून निघाले. विमानात बसून धरतीवर गेले. त्यापूर्वी मच्छिंद्रनाथांनी जड अंतःकरणांनी किलोत्तलेचा निरोप घेतला. आश्रू भरलेल्या नेत्रांनी तिने मच्छिंद्रनाथांना निरोप दिला. नाथांनी

निघतांना मीननाथाला सोबत घेतले. त्यानंतरच्या कालावधीत मीननाथांनी तीन सिद्ध निर्माण केले. मैनावतीला हेलापट्टण येथे पोहोचविले. सर्व सिद्धांना सोबत घेऊन अनेक तीर्थक्षेत्रांना भेटी दिल्या.

देवराज इंद्र स्वतःच्या कृतीने नाथांच्या शापाचा धनी झाला. पण उःशापाच्या प्राप्तीसाठी सह्याद्री पर्वतांच्या शिखरावर तपश्चर्येसाठी बसला. तपासाठी त्याने स्वर्गातून मणीकर्णिका नदीचे पाणी आणले होते. मंत्र प्रयोग म्हणत पाणी सोडीत असताना बारा वर्षात त्याचा प्रवाह तयार होऊन इंद्रायणी नदीचा उगम झाला आणि ती पुढे भीमा नदीस मिळाली. बारा वर्षांचे खडतर तप पूर्ण करून तो इंद्रलोकी परतला. ज्या संरक्षक अस्त्रांची मक्तेदारी नाथांकडेच होती, त्याला तडा गेला आणि उःशापाच्या खडतर साधनेद्वारा आता इंद्रही ती अस्त्रे वापरणार हे निश्चित झाले. पण नाथांनी ही अस्त्रे वैयक्तिक स्वार्थासाठी किंवा लाभासाठी कधीच वापरली नव्हती. हे कुणीही नाकारू शकणार नाही.

नवनाथ हे तर आदिनाथ श्रीशिव आणि श्रीगुरु दत्तात्रेयांच्या कृपाप्रसादामुळे चिरंजीवाच होते. शके १७१० पर्यंत म्हणजे सुमारे १७८८ ८९ पर्यंत नवनाथ प्रकटपणे भ्रमंती करीत होते. त्यानंतर ते आपआपल्या ठिकाणी गुप्त रुपात राहू लागले. मढी, जिल्हा नगर, तालुका पाथर्डी येथे कानिफनाथ उर्फ कान्होबा, त्याच्या दक्षिणेस गर्भगिरीवर मच्छिंद्रनाथ उर्फ मायंबा राहिले. गर्भगिरीच्या वर पूर्व दिशेला जालिंदरनाथ उर्फ जानपीर राहिले असून खालील बाजूस गहिनीनाथ उर्फ गैबीपीर राहिले आहेत. वडवाळ गावात नागनाथ, माणदेश, विटे गावात रेवणनाथ राहिले आहेत. चर्पटीनाथ, चौरंगीनाथ, अडबंगनाथ अद्यापही गुप्तपणे तीर्थ क्षेत्रांची भ्रमंती करीत आहेत. भर्तरीनाथ पाताळात जाऊन राहिले आहेत. मीननाथ स्वर्गलोकी गेले. गिरनार पर्वतावर दत्ताश्रमामध्ये गोरक्षनाथ राहिले. गोपीचंद राजा आणि धर्मनाथ स्व सामर्थ्यावर वैकुंठात गेले. तर मैनावतीला विमानातून श्रीविष्णू घेऊन गेले. पुढे नवनाथांचे ८४ सिद्धांपासून नाथपंथाचा अधिकाधिक प्रसार वाढला.

या ग्रंथाचे आद्य ग्रंथाकार, श्रीगोरक्षनाथ म्हणात की, यातील कथा अद्भुत आणि सत्य असल्याने त्याची कोणी निंदा केल्यास निंदकावर संकटे कोसळतील. निंदक इहलोकी आणि परलोकीसुद्धा सुखी राहणार नाही. त्याचा सर्वनाशाच होईल. म्हणून भाविक भक्तांनी निंदा सोडून विश्वास ठेवावा, श्रद्धा बाळगावी आणि नवनाथ कृपेचा चमत्कार काय असतो त्याचा अनुभव घ्यावा. फलश्रुतीमध्ये कथन केल्याप्रमाणे एखादी इच्छा मनात धरून त्यासाठी तो अध्याय दररोज सहा महिने पठण केल्यास निःसंशय इच्छापूर्ती होईल. यशप्राप्ती होईल. जर कुणी निरक्षर असेल तर घरात ठेवून ग्रंथास रोज एक फुल वाहून पूजा केल्यास त्याचाही इष्ट परिणाम होऊन कार्यसिद्धी होईल. कुणाला अध्याय वाचावयास वेळ मिळत नसेल तर त्याने अध्यायातली एक ओवी वाचून निघावे. कामात यश निश्चित मिळेल.